कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक संशोधक छात्रांच्या निवास व्यवस्थेसाठी अतिथीगृहाच्या दुसऱ्या मजल्याच्या बांधकामाकरीता निधी वितरीत करणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र.केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १५ मार्च, २०२४.

**पहा :-** १) विभागाचा समक्रमांकाचा दि.१०.११.२०२२ रोजीचा शासन निर्णय

२) विभागाचा समक्रमांकाचा दि.२७.०२.२०२३ चा शासन निर्णय, दि.१०.०३.२०२३ चे शासन शुद्धीपत्रक व दि.२२.०६.२०२३ रोजीचा शासन निर्णय.

३) कुलसचिव, कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांचे दि. ०८.०२.२०२४ रोजीचे पत्र.

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना** : कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील संशोधक विद्यार्थी निवास व्यवस्थेसाठी अतिथीगृहाच्या दुसऱ्या मजल्याच्या बांधकामाकरिता रु.२३०.४२ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या बांधकामाकरीता संदर्भ क्र.२ येथील निर्णयान्वये रु.२११.७२ लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे. आता सदरहू बांधकाम तातडीने पूर्ण होण्यासाठी उर्वरित निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये विद्यापीठाने विनंती केली आहे. तद्नुषंगाने वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविल्यानुसार या बांधकामास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** विद्यापीठाने सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक या विद्यापीठाच्या संशोधक विद्यार्थी निवास व्यवस्थेसाठी अतिथीगृहाच्या दुसऱ्या मजल्याच्या बांधकामासाठी उर्वरित निधी रु.१८,७०,०००/- (अक्षरी रुपये अठरा लक्ष सत्तर हजार फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू वितरीत झालेला निधी कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली

पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्चशिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदरखर्च "मागणी क्र. डब्ल्यु- ०२, मुख्य लेखाशीर्ष २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, (००) (१४) कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर विकास (कार्यक्रम) (२२०२ ३४९५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षा खाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३०७/२०२४/व्यय-५, दि.११.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२१२५५९९१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c66207630576336152194 4ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.15 21:36:05 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. कुलगुरु, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ प्रती)
४. कुलसचिव, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
५. सह संचालक(उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
१०. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव, (विशि) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.